**पिंपळगावखांड लघु पाटबंधारे योजना ता.अकोले, जि.अहमदनगर, या योजनेस प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा- २०१५/(३७१/२०१५)/ लपा-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १७ जूलै, २०१७

**पहावे-**

१) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ,औरंगाबाद यांचे पत्र क्र. कासं /गोमपाविम /ता-५/११३४२,दि. २१.१२.२०१५

२) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे पत्र क्रमांक: व्यअस-२०१७/प्र.क्र.१२९/अर्थसं-२ दिनांक -१६.०६.२०१७.

**प्रस्तावना :**

पिंपळगावखांड ल.पा.योजना ता.अकोले जि.अहमदनगर, या योजनेस शासन निर्णय क्र. क्र.लपायो-२००९/प्र.क्र.(२५५/२००९)/खारभुमी मंत्रालय मुंबई-३२ दि.१५.०७.२००९ अन्वये एकूण रु. ४४५८.६६ लक्षच्या किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. हा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन २००८-०९ च्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात दरसूचीतील फरकामुळे, जास्त दराची निविदा स्वीकृती, भूसंपादन किंमतीतील झालेली वाढ, संकल्पचित्रातील बदल इत्यादी कारणांमुळे वाढ होत असल्यामुळे योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे.

**शासन निर्णय :**

आता या निर्णयान्वये पिंपळगावखांड ल.पा.योजना ता.अकोले, जि.अहमदगनर या योजनेचा एकूण अंदाजीत खर्च रुपये १०१.०५ कोटी (रु. एकशे एक कोटी, पाच लक्ष फक्त) या किंमतीस सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामासाठी एकूण रूपये ९६.०८ लक्ष (रू. शहान्नव कोटी, आठ लक्ष फक्त) व अनुषंगीक खर्च रूपये ४.९७ लक्ष (रू. चार कोटी, सत्त्यानव लक्ष फक्त) आहेत. अंदाजपत्रकात उर्वरित कामासाठी सन २०१३- १४ या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशिर्षवार तरतुदींचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक ३१मे, २०१७ रोजी झालेल्या बैठकीत "सदरचा प्रस्ताव खालील अटींच्या अधीन राहून मान्य करण्यात आला आहे."

१) जलसंपदा विभागाच्या दिनांक ०२ मे, २०१७ च्या शासन निर्णयानुसार या प्रकल्पांतर्गतच्या लाभक्षेत्रास सूक्ष्म सिंचनास पूरक वितरण व्यवस्था निर्माण करण्याच्या अनुषंगाने आढावा घेऊन भूसंपादनावरील खर्चातील बचतीचा विभागाने प्राधान्याने आढावा घ्यावा.

२) चालू आर्थिक वर्षात निधी उपलब्धतेच्या अनुषंगाने नियोजन विभाग व वित विभाग यांच्या सहमतीनंतरच प्रकल्पासाठीच्या कामांची निविदा प्रक्रिया सुरु करण्यात यावी.
३) प्रकल्पाचे काम विभागाने मार्च,२०१८ अखेर पूर्ण करणे बंधणकारक राहील. अन्यथा संबंधितांवर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशिर्ष,"४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ८०- सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) सार्वजनिक व इतर क्षेत्रातील गुंतवणुका (००) (०३) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०२ ४९२७)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १०९/का-१४३४, दि.०३.०६.२०१६, तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २२८/व्यय-१२, दि.२९.०८.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार व्यय अग्रक्रम समितीने दि. ३१मे, २०१७ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत दिलेल्या मंजुरीनुसार व संदर्भ क्रमांक २ नुसार याबाबतच्या निर्गमीत केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकिय मान्यता (१६४/२०१७) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१८१७२९५५९९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dharane
Mallikarjun
Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2017.07.18 18:14:32 +05'30'

**( म.ई. धरणे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
३. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
४. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
५. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद

६. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक

७. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. जिल्हाधिकारी,अहमदनगर

९. अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

१०.विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

११. लपा-१, संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : सुप्रमा-२०१५/(३७१/२०१५)/लपा-१, मंत्रालय, मुंबई -३२.दि. १७ जूलै, २०१७ चे परिशिष्ट**

**पिंपळगावखांड ल.पा.योजना ता.अकोले, जि.अहमदनगर**

**उपशिर्षनिहाय तरतूदी**

| क्र. | उपशिर्ष | रक्कम (रूपये) कोटी |
|---|---|---|
| १ | 'ए' प्राथमिक | ०.१० |
| २ | 'बी' भूसंपादन | ३१.२० |
| ३ | 'सी' मुख्य कामे | |
| | अ)धरणाचे काम ,सांडवा. | ६१.९६ |
| | ड)विमोचक | २.४७ |
| ४ | के-इमारती | ०.०४ |
| ५ | 'ओ' किरकोळ कामे | ०.०२ |
| ६ | 'पी' व्यवस्थापन | ०.१६ |
| ७ | 'आर' दळणवळण | ०.१३ |
| ८ | बुडीत क्षेत्रातील पूल | ०.०० |
| | **एकुण** | **९६.०८** |
| | अनुषंगिक खर्च | ४.९७ |
| | **योजनेची एकूण किंमत (रु.कोटी)** | **१०१.०५** |

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र १७७८ हेक्टर आहे.

ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा १६.९९दलघमी. आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु. ५९,४६७/-

ड) लाभव्यय गुणोत्तर १.३१ > १